**आशियायी विकास बँक सहाय्यीत 'कृषि व्यापार विषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम (AIDIP) प्रकल्पांतर्गत उच्चाधिकार समितीचे गठन.**

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक बासप्र २००८/प्र.क्र.४६/२१-स,
शिबीर कार्यालय, नागपूर
दिनांक : ०३ डिसेंबर, २०१०.

**वाचा :** १. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.कृबास २००७ / प्र.क्र.४५२/ ११-स, दि. १६.०४.२००८
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.बासप्र-२००८/ प्र.क्र.४६/२१-स, दि.२९.१०.२०१०

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने संदर्भांकीत शासन निर्णय दिनांक २९.१०.२०१० अन्वये आशियायी विकास बँक सहाय्यीत 'कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम' या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याबाबत निर्णय घेतला आहे. या प्रकल्पाकरिता सहकार व पणन विभागाची 'नोडल विभाग' म्हणून नेमणुक करण्यात आली आहे.

या प्रकल्पाच्या माध्यमातून 'राज्यातील सध्याच्या मुल्य साखळींलगतचे कालबाहय झालेले तंत्रज्ञान, कृषी पणन क्षेत्रामधील पायाभूत सुविधांच्या निर्माणामध्ये सार्वजनिक गुंतवणूकीचा असलेला आभाव व नगदी पिकांच्याबाबतीत (High Value Crops) असलेले मर्यादित वैविध्यीकरण' या कृषी विकासाच्या मार्गातील प्रमुख अडथळयांवर मात करण्याकरिता, "एकात्मीक मुल्य साखळी (Integrated value chain)" या प्रतिमानावर (Model) आधारित राज्याच्या विविध प्रादेशिक भागांमध्ये उत्पादित होणा-या कृषी मालाकरीता एकात्मिक मुल्य साखळयांची निर्मिती करणे तसेच कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा, रस्ते, वीज, पाणी यासारख्या इतर मुलभूत सुविधा त्याचप्रमाणे बाजारपेठविषयक संशोधन (Market Intelligence), शेतक-यांची क्षमता बांधणी (Capacity Building) व अस्तित्वातील मुल्य साखळींच्या बळकटीकरणाव्दारे कृषी मालाच्या मुल्य साखळीलगतच्या भौतिक व संस्थात्मक जाळयांमध्ये सुधारणा घडवून आणण्यात येणार आहे.

या प्रकल्पाच्या माध्यमातून सार्वजनिक-खाजगी भागीदारीतून राज्यामध्ये निर्माण होणाऱ्या एकात्मीक मुल्य साखळयांना मान्यता देण्याकरीता तसेच प्रकल्पाच्या कार्यान्वयनाचा वेळोवेळी आढावा घेण्याकरीता मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती गठन करण्याबाबत संदर्भांकित शासन निर्णय दिनांक २९.१०.२०१० अन्वये निर्णय घेण्यात आला होता. त्यानुषंगाने सदर प्रकल्पांतर्गत राज्यस्तरीय

उच्चाधिकार समिती गठीत करण्याची बाब शासन विचाराधीन होती त्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१. आशियायी विकास बँक सहाय्यीत 'कृषि व्यापार विषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम' या प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली 'कृषि पणनकरीता राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती' गठीत करण्याचा निर्णय या शासन निर्णयान्वये घेण्यात येत असून सदर समितीची रचना खालीलप्रमाणे राहील-

| | | |
|---|---|---|
| १. मा. मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव (सहकार व पणन) | - | सदस्य-सचिव |
| ३. प्रधान सचिव (नियोजन) | - | सदस्य |
| ४. प्रधान सचिव (वित्त) | - | सदस्य |
| ५. प्रधान सचिव (कृषि) | - | सदस्य |
| ६. प्रधान सचिव (उद्योग) | - | सदस्य |
| ७. केंद्रीय कृषि मंत्रालयाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ८. केंद्रीय वित्त मंत्रालयांतर्गतच्या अर्थव्यवहार विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ९. आयुक्त (कृषि) | - | सदस्य |
| १०. संचालक (फलोत्पादन) | - | सदस्य |

ही समिती या प्रकल्पाच्या कार्यकारी व अंमलबजावणी यंत्रणांकरीता सल्लागाराची भूमिका पार पाडेल तसेच समिती आवश्यकतेप्रमाणे इतर प्रतिनिधी वा तज्ञांनादेखील सल्ला-मसलतीकरीता निमंत्रित करु शकेल.

२. उपरोक्त उच्चाधिकार समितीच्या वर्षातून किमान दोन वेळा बैठका घेण्यात याव्यात व त्या बैठकीमध्ये प्रामुख्याने पुढील बाबींविषयक कामकाज पहावे-

i) प्रकल्पाच्या प्रगतीचा आढावा घेणे.

ii) प्रकल्पांतर्गत आखण्यात येणाऱ्या एकात्मीक मुल्य साखळींना व पर्यायाने प्रकल्पाची निवड करुन त्यांना मान्यता प्रदान करणे.

iii) प्रकल्पाशी निगडीत कोणत्याही प्रश्नाबाबत राज्यस्तरावरुन निर्णय होणेआवश्यक असेल अशा बाबींवर कार्यवाही करणे.

३.	या समितीच्या प्रमुख जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील -

i) राज्यस्तरावरुन नियोजन व धोरणविषयक बाबीमध्ये मार्गदर्शन करणे.

ii) प्रकल्पाच्या प्रगतीचा व फलनिष्पत्तीचा वेळोवेळी आढावा घेणे व प्रकल्पाचे संनियंत्रण करणे.

iii) राज्यस्तरीय कार्यकारी यंत्रणा आणि इतर अंमलबजावणी यंत्रणांकरीता प्रशिक्षण व क्षमता बांधणी /विकास करणे आणि त्यांचे संनियंत्रण करणे.

iv) प्रकल्पाकरीता राज्य शासनातर्फे आवश्यक असलेल्या परवानग्या मिळवून देण्याकरीता मार्गदर्शन करणे.

v) पायाभुत सुविधा विकासविषयकच्या राज्य शासनाच्या गुंतवणूकीमध्ये 'एक केंद्रभिमुखता (Convergence)' आणणेकामी मदत करणे तसेच प्रकल्पामध्ये सहभागी इतर विभागांसोबत सहकार्य करणे.

vi) या प्रकल्पाच्या माध्यमातून राज्यामध्ये एकात्मीक मुल्य साखळींच्या माध्यमातून निर्माण करण्यात येणाऱ्या पायाभुत सुविधांचा वापराकरीता शेतकऱ्यांकडून आकारावयाच्या सेवाशुल्काचा नियमितपणे आढावा घेणे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा क्रमांक २०१०१२०३२०१५१३००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
(श्रीकांत चं. आंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

१.	मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
२.	मा. मंत्री (पणन) यांचे स्वीय सहाय्यक.
३.	मा. मंत्री (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक.
४.	मा. राज्यमंत्री (पणन) यांचे स्वीय सहाय्यक.
५.	मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
६.	मा. प्रधान सचिव (सहकार व पणन / नियोजन / वित्त / कृषि / उद्योग )
७.	आयुक्त उद्योग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८.	पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९.	कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.

१०. सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था
११. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१२. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
१३. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, नागपूर
१४. निवासी लेखापरिक्षण अधिकारी, मुंबई
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६. वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३)
१७. कक्ष अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९ . निवड नस्ती (२१-स)